**किल्ले विशाळगड, ता. शाहुवाडी, जिल्हा कोल्हापूर या ठिकाणी आंदोलनादरम्यान झालेल्या नुकसानीच्या अनुषंगाने वाढीव मदत देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- सीएलएस २०२४/प्र.क्र.१८१/म-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०२ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. आरएलएफ-२०१४/६३/प्र.क्र.३२९/म-३, दि. ०५/०१/२०१६
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि. २७.०३.२०२३
३) जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे आदेश क्र.कार्या.१२/अ/१/नैआ/कावि/३५१/२०२४, दि. १७/०७/२०२४
४) विभागीय आयुक्त यांचे पत्र क्र. साप्र/३/कावि/४५१/२०२४, दिनांक १९/०७/२०२४
५) जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे पत्र क्र.कार्या.७/गृह-१/आरआर/१८९८, दि. २६/०७/२०२४

**प्रस्तावना:-**

विभागीय आयुक्त, पुणे यांनी दि.१९.०७.२०२४ च्या पत्रान्वये किल्ले विशाळगड ता. शाहुवाडी या ठिकाणी आंदोलनादरम्यान झालेल्या नुकसानीचा अंतिम अहवाल शासनास पाठविलेला आहे. दि.१४.०७.२०२४ रोजी कोल्हापूर जिल्ह्यातील शाहुवाडी तालुक्यातील किल्ले विशाळगड येथील अतिक्रमण काढणेबाबत विविध संघटनांकडून मौजे गजापूर तसेच मुसलमान वाडी येथे अचानक दगडफेक करुन घरांचे व सार्वजनिक मालमत्तेचे नुकसान झाले आहे. तातडीची मदत म्हणून जिल्हा आपत्ती व्यवस्था प्राधिकरण मधून ५६ बाधित कुटूंबाना तात्काळ प्रापंचिक साहित्य, सानुग्रह अनुदान व दैनंदिन मदत म्हणून प्रत्येकी रक्कम ₹२५,०००/- असे ₹१४ लाख व एकूण बाधित ४२ घरांच्या दुरुस्तीसाठी प्रत्येकी रक्कम ₹२५,०००/- प्रमाणे असे ₹१०,५०,०००/-असे एकूण ₹२४,५०,०००/- इतके अनुदान वाटप करण्यात आले आहे.

तहसिलदार शाहुवाडी यांचेकडील सुधारित पंचनाम्यानुसार ₹१,४९,९०,९००/- इतकी रक्कम मौजे गजापूर, मुसलमान वाडी ता.शाहुवाडी येथील नुकसानग्रस्त लोकांना वाटप करण्याकरिता अनुदान मिळण्याबाबतचा अहवाल जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी विभागीय आयुक्त यांचेमार्फत शासनास सादर केला आहे.

तसेच दि.२६.०७.२०२४ च्या पत्रान्वये जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी प्रधान सचिव, मदत व पुनर्वसन विभाग यांना किल्ले विशाळगड या ठिकाणी आंदोलनादरम्यान आंदोलकांनी नुकसान केलेल्या कुटूंबाना तातडीची मदत मिळण्याबाबत विनंती केली आहे.

प्रस्तुत प्रकरणी, दि.३०.०७.२०२४ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीतील निर्देशानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

**शासन निर्णय :-**

किल्ले विशाळगड ता. शाहुवाडी या ठिकाणी आंदोलनादरम्यान झालेल्या घरांच्या/ मालमत्तेच्या नुकसानीच्या अनुषंगाने ₹१,४९,९०,९००/- (अक्षरी एक कोटी एकोणपन्नास लक्ष नव्वद हजार नऊशे फक्त) इतक्या रक्कमेस मदत देण्यासाठी मंजूरी देण्यात येत आहे.

तसेच, उपरोक्त मदत ही खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१. मालमत्तेच्या झालेल्या नुकसानीबाबत नैसर्गिक आपत्तीसाठी विहीत केलेल्या निकषांचा अवलंब करण्यात यावा.
२. मालमत्ता नुकसानीच्या मदतीकरिता पात्र व्यक्तीस उत्पन्नाची कोणतीही अट राहणार नाही.
३. बाधित व्यक्तींचा या घटनेमध्ये गुन्हेगार म्हणून सहभाग नसावा. तसेच त्याच्यावर या घटनेचा गुन्हा /प्रथम खबरी अहवाल दाखल केलेला नसावा. या घटनेबाबत त्याचेवर कोणतेही गुन्हे दाखल नसल्याचे पोलीस विभागाकडून खातरजमा करण्यात यावी.
४. मदत वाटप करण्यापूर्वी झालेल्या मालमत्ता नुकसानीसाठी संबंधित विभाग (सार्वजनिक बांधकाम विभाग/परिवहन विभाग/स्थानिक प्राधिकरण इत्यादी) यांचे अभिप्राय घेण्यात यावे.
५. नुकसानी संदर्भात जर विमा कंपनाकडून नुकसान भरपाई मिळाली असेल तर त्या आपदग्रस्तांना मदत्त अनुज्ञेय राहणार नाही.
६. सदर मदत ही संबंधित जिल्हाधिकारी यांच्या नियंत्रणात करण्यात यावी.

या बाबीवर होणारा खर्च मागणी क्र.सी-५ -२२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण ६० इतर सामाजिक सुरक्षा कल्याण कार्यक्रम - २०० इतर कार्यक्रम, (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य (०१) (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य, ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२३५ ०३४७) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध निधीतून अथवा पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०२१७१९४४१४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY JAYRAM KUDAVE

Digitally signed by SANJAY JAYRAM KUDAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=0499fc5d7e388de7a10d303d048c7ab3e4aaf97e3f5733c079f584506fbfaae7, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=377DD6A98181A786A7A6EEFB762E75E4DD790D349657CF49A47DFF709B61A055, cn=SANJAY JAYRAM KUDAVE
Date: 2024.08.02 17:34:32 +05'30'

**(संजय कुडवे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त, पुणे
२) संचालक, आपत्ती व्यवस्थापन, मंत्रालय, मुंबई.
३) जिल्हाधिकारी कार्यालय, कोल्हापूर
४) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर

**प्रत माहितीसाठी अग्रेषित**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव
५) महालेखापाल ½, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
६) महालेखापाल ½, (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
७) मा.प्रधान सचिव, मदत व पुनर्वसन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८) वित्त विभाग (व्यय-९/) मंत्रालय, मुंबई
9) कार्यासन ब-१, म-११, म-७ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई